**मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दिनांक ०१.१०.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्र. मुदतवाढ-२०१८/१६६०/प्र.क्र.५३५/मोप्र-(२),**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :२९/१०/२०१८**

**पहावे:-**
1) शासन निर्णय क्रमांक मुदतवाढ-२०१८/(१२५/२०१८)/मोप्र-(२), दिनांक २६.०४.२०१८.
2) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई क्र.आढावा १००२/(३३५/२००२)आ(प्रशि), दिनांक ०६/०२/२००३.
3) मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर यांचे पत्र क्र. २८३०/ मुअगोप्र/आ-२/मुदतवाढ/२०१८, दिनांक ०४/०९/२०१८ चे पत्र.
4) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि. ०७/०९/२०१८.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय आस्थापनेचा आढावा व आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०१८ ते ३०.०९.२०१८ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक ४ चे वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यावर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/१०/२०१८ ते दिनांक २८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय:-**

आता संदर्भीय क्रमांक ३ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार उपरोक्त कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दिनांक ०१.१०.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यंत खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

1) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
2) ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्याहून अधिक कालावधीसाठी रिक्त नसतील.

यावर होणारा खर्च मागणी क्रमांक आय-५ (नियत अस्थाई आस्थापना), मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधा-यावरील भांडवली खर्च (८०), सर्वसाधारण (१९०), सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे, (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळाना भागभांडवली अंशदान (वेतन)(०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (अनिवार्य) (४७०१ आय १७१) या लेखाशिर्षाखालील खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ०७/०९/२०१८ यानुसार विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थाळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२९१५२५१६६०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Abhay Keshaorao Yedsikar

Digitally signed by Abhay Keshaorao Yedsikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5724dd2e45895f7c2ab554c8d0b0041f388e5f397467c37bb907e6cc635bd0fd, cn=Abhay Keshaorao Yedsikar
Date: 2018.10.29 15:28:08 +05'30'

**(अभय येडसीकर)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

सोबत:- विवरणपत्र

**प्रत:- सहपत्रासह,**

१. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई,
२. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर,
३. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर.
४. मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर.
५. मोप्र-(२) संग्रहार्थ.

## विवरणपत्र

**शासन निर्णय क्र. मुदतवाढ २०१८/१६६०/प्र.क्र.५३५/मोप्र-(२), दिनांक २९/१०/२०१८ चे सहपत्र**

**नियत अस्थाई आस्थापनेवरील एकूण ३० पदे (०१/१०/२०१८ ते २८/०२/२०१९)**

| अ.क्र. | पदनाम | आकृतीबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता (कार्यकारी अभियंता) | २ | २ |
| ३ | उप अभियंता | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता/सहा. अभियंता श्रेणी-२/शा. अ. | ३ | ३ |
| ५ | विशेष अधिक्षक | १ | १ |
| ६ | अधिक्षक | १ | १ |
| ७ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ८ | प्रथम लिपिक | १ | १ |
| ९ | मुख्य दप्तर कारकून | १ | १ |
| १० | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | लघु लेखक(उच्च/निम्न श्रेणी) | १ | १ |
| १३ | टंकलेखक | ३ | ३ |
| १४ | दूरध्वनी चालक | १ | १ |
| १५ | वाहनचालक | १ | १ |
| १६ | दप्तरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **३०** |
| **एकूण पदे ३०** | | | |